**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मिरा भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे या संस्थेद्वारे मौजे घोडबंदर सर्वे नं २२३ या ठिकाणी सांस्कृतिक भवन, विपश्यना केंद्र बहुउद्देशिय केंद्र बांधणे बाबत तत्वत: मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सावियो-२०२१/प्र.क्र.१३८/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०१ डिसेंबर, २०२१.

**वाचा :** १. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र: दवसू-२०१५/ प्र.क्र.३४७/ अजाक, दिनांक ०९ मार्च, २०१८.

**प्रस्तावना:**

राज्यातील नागरी व ग्रामीण क्षेत्रातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्ती/ गावांचा विकास करण्यासाठी व या घटकांना मुलभूत सुविधा पुरविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांना शासनस्तरावरुन मान्यता देण्यासाठी “भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना” अशी राज्यस्तर योजना सन २०१८-१९ पासून राबविण्याचा शासनाने दिनांक ०९ मार्च,२०१८ अन्वये निर्णय घेतलेला आहे. सदर योजनेंतर्गत भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मिरा भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे या संस्थेद्वारे मौजे घोडबंदर सर्वे नं २३३ या ठिकाणी सांस्कृतिक भवन, विपश्यना केंद्र बहुउद्देशिय केंद्र बांधणे बाबत तत्वत: मंजूरी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मिरा भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे या संस्थेद्वारे मौजे घोडबंदर सर्वे नं २३३ या ठिकाणी सांस्कृतिक भवन, विपश्यना केंद्र बहुउद्देशिय केंद्र बांधणे बाबत तत्वत: मंजूरी देण्याबाबत संबंधित मुख्य अभियंता (स्थापत्य) व मुख्य अभियंता (विद्युत) यांच्या शिफारशीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कामास रुपये १३,८५,२३,९००/- इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २० सप्टेंबर, २०१९मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्रमांक १३४(३)मधील वित्तीय अधिकारानुसार व शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, दिनांक २५ सप्टेंबर,२०१९नुसार मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर कामाच्या अंदाजपत्रकास संबंधित मुख्य अभियंता (स्थापत्य) व मुख्य अभियंता (विद्युत) कोकण विभाग यांची शिफारस प्राप्त झाल्यानंतर सहाय्यक आयुक्त, ठाणे यांनी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा.

४. सदर खर्च मागणी क्रमांक एन-३, २२२५ अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातींचे कल्याण, ७८९ अनुसूचित जाती उप योजना, (०४) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना, (०४)(०१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना राबविणे (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम), २७ लहान बांधकामे, २२२५ एफ ०८५ या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा. सदर मालमत्ता महानगरपालिकेची असेल. प्रस्तुत कामाच्या दुरुस्तीचा (Maintenance) व संचालनाचा पूर्ण खर्च संबंधित महानगरपालिकेमार्फत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२०२१२०९०१५९२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2021.12.02 12:12:17 +05'30'

**( रा. ना. सवने )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
२. सर्व सन्माननीय सदस्य, विधान सभा/ विधान परिषद,
३. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई, महाराष्ट्र राज्य,
४. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
५. मा. उप मुख्यमंत्री, तथा मंत्री (वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
६. मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
७. मा. राज्यमंत्री ( सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
८. मा. मंत्री सर्व यांचे खाजगी सचिव,
९. मा. राज्यमंत्री सर्व यांचे खाजगी सचिव,
१०. मा. अमुस/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र राज्य,
१२. मा. प्रधान सचिव (सा.न्या. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. विभागीय आयुक्त कोकण विभाग, मुंबई,
१४. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई,
१५. आयुक्त, महानगरपालिका, ठाणे,
१६. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१७. जिल्हाधिकारी, ठाणे,
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, ठाणे,
१९. मुख्याधिकारी नगर परिषद/ नगरपालिका, ठाणे,
२०. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, कोकण विभाग,
२१. सहायक आयुक्त, समाज कल्याण, ठाणे,
२२. निवडनस्ती (अजाक).